**कला संचालनालयाच्या नियंत्रणाखालील अशासकीय अनुदानित कला संस्थामधील अध्यापकीय पदांना व्दिस्तरीय / त्रिस्तरीय वेतनश्रेणी लागू करणेबाबत ...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एडीआर २०१८/प्र.क्र. ११०/१८ (भाग २)/तांशि-६**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १९ एप्रिल, २०२२.

**वाचा :-** उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक : एडिआर-२०१५/ प्र.क्र. ८५/ तांशि-६, दिनांक २७ फेब्रुवारी, २०१७.

**प्रस्तावना :-**

शालेय शिक्षण विभागाच्या नियंत्रणाखालील अशासकीय अनुदानित शाळांमधील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांप्रमाणे, अशासकीय अनुदानित कला संस्थांमधील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना विविध २३ शासन निर्णयांनुसार मिळणारे लाभ मिळावे, यासाठी मुंबई उच्च न्यायालय येथे याचिका क्र. २८१७/२०१४ व उच्च न्यायालय,खंडपीठ औरंगाबाद येथे याचिका क्र.३८७२/२००५ दाखल करण्यात आल्या होत्या. याचिकाकर्त्यांच्या मागण्या मान्य करून मा. न्यायालयांनी दि. ५.१०.२०१७ आणि दि. २६.०२.२०१८ च्या आदेशांन्वये सदर याचिका निकाली काढल्या आहेत. उपरोक्त लाभांमध्ये अशासकीय अनुदानित कला संस्थामधील अध्यापकीय पदांना व्दिस्तरीय / त्रिस्तरीय वेतनश्रेणी लागू करण्याचा समावेश आहे.

०२. उपरोक्त मागणीच्या अनुषंगाने नमूद करण्यात येते की, शालेय शिक्षण विभागाच्या नियंत्रणाखालील अनुदानित संस्थांमधील शिक्षकांची पात्रता / अर्हता /वेतनश्रेणी आणि अशासकीय अनुदानित कला संस्थांमधील शिक्षकांची पात्रता / अर्हता /वेतनश्रेणी यापेक्षा भिन्न आहेत. त्यामुळे शालेय शिक्षण विभागानुसार अशासकीय अनुदानित कला संस्थांमधील अध्यापकीय पदांना द्विस्तरीय / त्रिस्तरीय वेतन संरचना लागू करता येणार नाही. यासंदर्भात नमूद करण्यात येते की, शासकीय कला महाविद्यालयांमधील अध्यापकीय पदांना द्विस्तरीय /त्रिस्तरीय वेतनश्रेणी लागू करण्याकरिता, उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन निर्णय क्रमांक एडीआर-२०१५/प्र.क्र.८५/तांशि -६ दिनांक २७ फेब्रुवारी,२०१७ निर्गमित करण्यात आला आहे. सदर शासन निर्णयातील तरतुदी आवश्यक त्या बदलांसह अशासकीय अनुदानित कला संस्थांमधील शिक्षकीय कर्मचाऱ्यांना लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत दिनांक ३१ मार्च,२०२२ रोजी राज्य मंत्रिमंडळाच्या बैठकीमध्ये चर्चा झाली असून पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील अशासकीय अनुदानित कला संस्थांमधील अध्यापकांना व्दिस्तरीय / त्रिस्तरीय वेतनश्रेणी लागू करण्याची पुढील योजना दिनांक १ जानेवारी, १९८६ पासून कार्यान्वित करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

अ) दि. १.१.१९८६ पासून ४ थ्या वेतन आयोगानुसार व्दिस्तरीय / त्रिस्तरीय वेतनसंरचना

| अ.क्र. | पदनाम | मूळ वेतनश्रेणी (रु.) | वरिष्ठ वेतनश्रेणी (रु.) | निवडश्रेणी (रु.) |
|---|---|---|---|---|
| १ | सहाय्यक अधिव्याख्याता | १६४०-२९०० | २२००-४००० | ३२००-४६२५ (+विशेष वेतन २००) (कार्यरत पदांच्या १०% पदांकरीता) |
| २ | अधिव्याख्याता | २२००-४००० | ३२००-४६२५ (+विशेष वेतन २००) | ३२००-४६२५ (+ विशेष वेतन २५०) (कार्यरत पदांच्या १०% पदांकरीता) |
| ३ | प्राध्यापक | ३२००-४६२५ (+विशेष वेतन २००) | ३२००-४६२५ (+ विशेष वेतन २५०) (कार्यरत पदांच्या १०% पदांकरीता) | |

**ब) दि. १.१.१९९६ पासून ५ व्या वेतन आयोगानुसार व्दिस्तरीय / त्रिस्तरीय वेतनसंरचना**

| अ.क्र. | पदनाम | मूळ वेतनश्रेणी (रु.) | वरिष्ठ वेतनश्रेणी (रु.) | निवडश्रेणी (रु.) |
|---|---|---|---|---|
| १ | सहाय्यक अधिव्याख्याता | ५५००-९००० | ८०००-१३५०० | १२०००-१८००० (+ विशेष वेतन ७००) (कार्यरत पदांच्या १०% पदांकरीता) |
| २ | अधिव्याख्याता | ८०००-१३५०० | १२०००-१८००० | १२०००-१८००० (+ विशेष वेतन ७००) (कार्यरत पदांच्या १०% पदांकरीता) |
| ३ | प्राध्यापक | १२०००-१८००० | १२०००-१८००० (+ विशेष वेतन ७००) (कार्यरत पदांच्या १०% पदांकरीता) | |

**क) दि. १.१.२००६ पासून ६ व्या वेतन आयोगानूसार व्दिस्तरीय / त्रिस्तरीय वेतनसंरचना**

| अ.क्र. | पदनाम | मूळ वेतनश्रेणी (रु) | वरिष्ठ वेतनश्रेणी (रु.) | निवडश्रेणी (रु.) |
|---|---|---|---|---|
| १ | सहाय्यक अधिव्याख्याता | ९३००-३४८०० + ग्रेड पे ४३०० | १५६००-३९१०० + ग्रेड पे ५४०० | १५६००-३९१०० + ग्रेड पे ८००० (कार्यरत पदांच्या १०% पदांकरीता) |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २ | अधिव्याख्याता | १५६००-३९१०० + ग्रेड पे ५४०० | १५६००-३९१०० + ग्रेड पे ८००० | १५६००-३९१०० + ग्रेड पे ८६०० (कार्यरत पदांच्या १०% पदांकरीता) |
| ३ | प्राध्यापक | १५६००-३९१०० + ग्रेड पे ८००० | १५६००-३९१०० + ग्रेड पे ८६०० | |

राज्यातील अशासकीय अनुदानित कला संस्थामधील अध्यापकांना वरिष्ठ वेतनश्रेणी व निवडश्रेणीत पात्र होण्यासाठी उमेदवाराने खालील अटींची पूर्तता करणे आवश्यक राहील:-

१) सहाय्यक अधिव्याख्यात्यांना वरिष्ठ वेतनश्रेणी लागू करण्याकरिता त्याने खालील अटी पूर्ण करणे आवश्यक आहे:-

अ) त्याने १२ वर्षाची नियमित अर्हताकारी सेवा पूर्ण केली असली पाहिजे.

ब) सामान्य प्रशासन विभागाने गट - क मधील पदांच्या पदोन्नतीसाठी गोपनीय अभिलेख्यांच्या प्रतवारीबाबत विहित केलेले निकष पूर्ण करणे आवश्यक आहे.

२) अधिव्याख्यात्यांना वरिष्ठ वेतनश्रेणी लागू करण्याकरीता त्याने खालील अटी पूर्ण करणे आवश्यक आहे:-

अ) त्याने १२ वर्षाची नियमित अर्हताकारी सेवा पूर्ण केली असली पाहिजे.

ब) पदव्युत्तर पदवी ( एम.एफ.ए.) व्दितीय श्रेणीमध्ये उत्तीर्ण असणे आवश्यक आहे.

क) सामान्य प्रशासन विभागाने गट - अ मधील पदांच्या पदोन्नतीसाठी गोपनीय अभिलेख्यांच्या प्रतवारीबाबत विहित केलेले निकष पूर्ण करणे आवश्यक आहे.

३) प्राध्यापकांना वरिष्ठ वेतनश्रेणी लागू करण्याकरीता त्याने खालील अटी पूर्ण करणे आवश्यक आहे:-

अ) त्याने १२ वर्षाची नियमित अर्हताकारी सेवा पूर्ण केली असली पाहिजे.

ब) त्याने पी.एच.डी. उत्तीर्ण असणे आवश्यक आहे.

क) सामान्य प्रशासन विभागाने गट - अ मधील पदांच्या पदोन्नतीसाठी गोपनीय अभिलेख्यांच्या प्रतवारीबाबत विहित केलेले निकष पूर्ण करणे आवश्यक आहे.

४) सहाय्यक अधिव्याख्यात्यांना निवडश्रेणी लागू करण्याकरीता त्याने खालील अटी पूर्ण करणे आवश्यक आहे:-

अ) त्याने वरिष्ठ वेतनश्रेणीमध्ये किमान १२ वर्षांची नियमित अर्हताकारी सेवा पूर्ण केली असली पाहिजे.

ब) सामान्य प्रशासन विभागाने गट - अ मधील पदांच्या पदोन्नतीसाठी गोपनीय अभिलेख्यांच्या प्रतवारीबाबत विहित केलेले निकष पूर्ण करणे आवश्यक आहे.

५) अधिव्याख्यात्यांना निवडश्रेणी वेतनश्रेणी लागू करण्याकरीता त्याने खालील अटी पूर्ण करणे आवश्यक आहे:-

अ) त्याने वरिष्ठ वेतनश्रेणीमध्ये किमान १२ वर्षांची नियमित अर्हताकारी सेवा पूर्ण केली असली पाहिजे.

ब) त्याने पी.एच.डी. उत्तीर्ण असणे आवश्यक आहे.

क) सामान्य प्रशासन विभागाने गट - अ मधील पदांच्या पदोन्नतीसाठी गोपनीय अभिलेख्यांच्या प्रतवारीबाबत विहित केलेले निकष पूर्ण करणे आवश्यक आहे.

ड) लगतच्या १२ वर्षाच्या सलग सेवेमध्ये किमान एक एकल प्रदर्शन राज्य किंवा राष्ट्रीय गॅलरीमध्ये भरविणे आवश्यक आहे.

६. दिनांक १.१.१९८६ ते दिनांक ३१.१२.२००५ या कालावधीमध्ये वयाची ४५ वर्षे पूर्ण करणाऱ्या अध्यापकांना ते ज्या दिनांकाला वयाची ४५ वर्षे पूर्ण करतील, त्या दिनांकापासून शैक्षणिक अर्हता व प्रदर्शनाच्या अटीतून सूट देण्यात येत आहे.

७. नियमित पदोन्नतीसाठी अपात्र ठरलेल्या अध्यापकास व्दिस्तरीय / त्रिस्तरीय वेतनश्रेणीचा लाभ मिळणार नाही. त्याचप्रमाणे नियमित पदोन्नती नाकारलेल्या अध्यापकास देखील व्दिस्तरीय / त्रिस्तरीय वेतनश्रेणीचा लाभ मिळणार नाही.

८. व्दिस्तरीय / त्रिस्तरीय वेतनश्रेणी दिनांक १.१.१९८६ पासून लागू करण्यात येईल. तथापि व्दिस्तरीय / त्रिस्तरीय वेतनश्रेणीचे प्रत्यक्ष लाभ या शासन निर्णयाच्या दिनांकाच्या महिन्यापासून देण्यात येतील. सदर व्दिस्तरीय / त्रिस्तरीय वेतनश्रेणी दिनांक १.१.१९८६ पासून लागू करतांना त्याबाबतची कोणतीही थकबाकी न देता वेतनश्रेण्या काल्पनिकरित्या लागू करण्यात येऊन वेतननिश्चिती करण्यात येईल.

९. जे कर्मचारी दिनांक १.१.१९८६ ते या शासन निर्णयाच्या दिनांकापर्यंतच्या कालावधीत सेवानिवृत्त झाले असतील त्या कर्मचाऱ्यांची दिनांक १.१.१९८६, दिनांक १.१.१९९६ व दिनांक १.१.२००६ पासून सुधारित वेतनश्रेणीत वेतननिश्चिती करण्यात येईल. दिनांक १.१.१९८६ ते संबंधित कर्मचाऱ्यांच्या सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत अनुज्ञेय वेतनवाढी विचारात घेऊन निवृत्तिवेतन सुधारीत करण्यात येईल. सुधारीत निवृत्तिवेतनाचे प्रत्यक्ष लाभ ह्या शासन निर्णयाच्या दिनांकापासून देण्यात येतील. त्यापूर्वीची थकबाकी अनुज्ञेय असणार नाही. सेवानिवृत्तिवेतन सुधारित केले तरी त्या अनुषंगाने सेवानिवृत्तिवेतन विषयक इतर लाभ सुधारित करण्यात येऊ नयेत.

सदर लाभ मा.न्यायालयांनी दिलेल्या आदेशांची अंमलबजावणी करण्यासाठी अनुज्ञेय करण्यात येत आहेत. त्यामुळे सदर निर्णय केवळ अशासकीय अनुदानित कला संस्थांमधील शिक्षक कर्मचाऱ्यांना लागू राहतील.

यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक डब्ल्यू - ४, २२०५ कला व संस्कृती , १०१ ललित कला शिक्षण (०३) अशासकीय कला संस्थांना सहाय्य, (०३) (०१) सर्वसाधारण आवर्ती अनुदाने (अनिवार्य) (२२०५००५५) ३६, सहायक अनुदाने (वेतन) या लेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदरचा शासन निर्णय दिनांक ३१ मार्च,२०२२ रोजी राज्य मंत्रिमंडळाच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३५६/२०१९/सेवा-९ दिनांक ९ सप्टेंबर,२०१९ आणि ४४/२०२२/व्यय-५ दिनांक १२ जानेवारी,२०२२ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४१९१२३६४३७९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sandesh Rajaram Utekar

Digitally signed by Sandesh Rajaram Utekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher & Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=009789e9fe23fde06096381e43bebecd32b5c692c899745eee7d89d805005a87, cn=Sandesh Rajaram Utekar
Date: 2022.04.19 12:39:35 +05'30'

**( सं. रा. उतेकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानभवन मुंबई.
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानभवन मुंबई.
५. मा.राज्य मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल, महाराष्ट्र ( लेखा व अनुज्ञेयता ) , महाराष्ट्र १ / २, मुंबई/नागपूर.
७. महालेखापाल ( लेखा परिक्षा), महाराष्ट्र १ / २, मुंबई / नागपूर.
८. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
९. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१०.सर्व सह / उप सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.कला संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१२.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर / औरंगाबाद,
१५. निरीक्षक, चित्रकला व शिल्प, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१६. वित्त विभाग (सेवा-९) व (व्यय-५), मंत्रालय, मुंबई,
१७. निवड नस्ती, उच्च व तंत्र शिक्षण विभाग (तांशि-६).